**मंत्र्यांचा दर्जा दिलेल्या व्यक्तींनी आयोजित केलेल्या बैठकांना शासकीय अधिकाऱ्यांनी उपस्थित न राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.१२८/१०/१८ (र.व का.),
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १० मे, २०११.

वाचा :-१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-मुस-१०९२/प्र.क्र.६५/एक, दिनांक १ ऑगस्ट, १९९२.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-१००२/९४३/प्र.क्र.२६/२००२/१८(र.व का.), दिनांक २६ सप्टेंबर, २००२.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-१०१०/प्र.क्र.२६/१०/१८(र.व का.), दिनांक २५ ऑगस्ट, २०१०.

## परिपत्रक

आमदार/खासदार/विरोधी पक्षनेते इत्यादि अशासकीय सदस्य, आपल्या मतदार संघातील शासकीय कामकाजासंबंधी संबंधीत शासकीय अधिकाऱ्यांना चर्चा / भेटीसाठी बोलावितात किंवा त्याकरिता बैठक आयोजित करतात. त्यावेळी शासकीय अधिकारी येत नाहीत, असा मुद्दा विधिमंडळ सदस्य वारंवार उपस्थित करतात किंवा आमदार/खासदार/विरोधी पक्षनेते इत्यादिंनी चर्चा / भेटी / बैठकीसाठी बोलाविल्यास जावे किंवा नाही, याची विचारणा शासकीय अधिकाऱ्यांकडून होते. त्यासंदर्भात आता पुन्हा तपासणी केल्यावर संदर्भांकित क्रमांक १ येथील दिनांक १ ऑगस्ट, १९९२ च्या परिपत्रकातील सूचना योग्य असल्याचे आढळले आहे. यास्तव, संदर्भाधीन शासन परिपत्रक दि. २६.०९.२००२ आणि २५.०८.२०१० मधील सूचना अधिक्रमित करुन दिनांक १ ऑगस्ट, १९९२ च्या परिपत्रकातील सूचनांचे काटेकोरपणे पालन होण्याच्या दृष्टीने त्यांचा खालीलप्रमाणे पुनरुच्चार करण्यात येत आहे.

१) विधानसभा आणि विधान परिषद यातील विरोधी पक्षनेते, राज्य शासनाच्या काही उपक्रमांचे आणि उच्चस्तरीय समित्यांचे अध्यक्ष इत्यादि महत्वाच्या अशासकीय व्यक्तींना शासनाने मंत्र्यांचा दर्जा, त्या व्यक्तींना त्यांनी धारण केलेल्या पदामुळे त्यांच्यावर पडणाऱ्या जबाबदाऱ्या नीटपणे पार पाडता याव्यात या हेतूने दिलेला आहे.

२) ज्याप्रमाणे शासनाच्या मंत्र्यांना संबंधित प्रशासकीय कामावर देखरेख करण्याचे व संबंधित अधिकाऱ्यांची बैठक आयोजित करुन अथवा त्यांना भेटीसाठी बोलावून व त्यांचेशी विचारविनिमय करुन त्यांना सूचनावजा आदेश देण्याचे अधिकार आहेत. त्याप्रमाणे

अधिकार मंत्र्यांचा दर्जा देण्यात आलेल्या विधानसभा व विधान परिषद यातील विरोधी पक्षनेते, इत्यादि अशासकीय व्यक्तींना नाहीत व ती त्यांची कार्यकक्षा नव्हे.

३) दैनंदिन प्रशासकीय कामकाजाच्या व शासनाच्या योजना, प्रकल्प धोरण यांच्या अंमलबजावणीच्या प्रक्रियेत वरील (१) येथील अशासकीय व्यक्तींनी हस्तक्षेप करु नये.

४) विधानसभा व विधान परिषदांचे विरोधी पक्षनेते आणि अन्य महत्वाच्या अशासकीय व्यक्ती यांनी त्यांच्या कामाचा भाग म्हणून बैठका आयोजित केल्यास, शासकीय अधिकाऱ्यांनी अशा बैठकांना उपस्थित न राहण्याबाबत खबरदारी घ्यावी वा जिल्हयात दौरा आयोजित केल्यास त्यांनी अशा दौऱ्यात त्यांच्याबरोबर सहभागी होण्याचे कटाक्षाने टाळावे.

वरील आदेशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५१०१७३८०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रत्नाकर गायकवाड

**( रत्नाकर गायकवाड )**
**शासनाचे मुख्य सचिव**

प्रति,

सर्व सन्माननीय संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य,
राज्यपालांचे सचिव (५प्रती)
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५प्रती)
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव (५प्रती)
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे कार्यालय,
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (१० प्रती)
*मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांनी त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागप्रमुख / कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास वरील बाब आणावी.)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई, (५प्रती)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.